**वित्तीय वर्ष २०२४-२५ मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला उपकराची व शासन अंशदानाची रक्कम वितरित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४०/दुवपु-२**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २८ मार्च, २०२५

**संदर्भ- १. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४**
**२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.**

**प्रस्तावना :**

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बांधणी करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर व बेटावरील इमारतींवर दुरुस्ती उपकर आकारला जातो. तसेच, कलम ८५ अन्वये तो बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून वसूल करण्यात येतो व एकूण वजावटीच्या ५ टक्के रक्कम वगळून उर्वरित रक्कम राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येते. दुरुस्ती उपकराची व अंशदानाची रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती कलम ८६ (१) व कलम ९७ (१) नुसार मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येते.

**शासन निर्णय :**

मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या अधिनस्त मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्याकरिता दुरुस्ती उपकराच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०२४-२५ च्या गृहनिर्माण विभागाच्या खर्चाच्या विवरणपत्रात मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०५) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०६२५) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु.३९,९०,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) इतकी व मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०२) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०५९२) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु.३९,९०,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) इतकी अशी एकूण रू.७९,८०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली होती.

वित्त विभागाने दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरणासंदर्भात सूचना निर्गमित केल्या आहेत. वित्त विभागाने सन २०२४-२५ करीता क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०५) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरीता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०६२५) ३२, अंशदाने या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रू.२७.९३ कोटी तसेच लेखाशीर्ष (२२१६०६२५), ३२- अंशदाने अनिवार्य) याखाली रू.२७.९३ कोटी असे एकूण रु. ५५.८६ कोटी इतक्या रक्कमेस मान्यता दिली आहे.

त्यानुषंगाने सुधारित अंदाजाच्या मर्यादेत लेखाशीर्ष (२२१६०५९२),३२- अंशदाने (अनिवार्य) याखाली रू.२७.९३ कोटी तसेच लेखाशीर्ष (२२१६०६२५), ३२- अंशदाने अनिवार्य) याखाली रू.२७.९३ कोटी असे एकूण रु. ५५.८६ कोटी (अक्षरी रुपये एकूण पंचावन्न कोटी शहाऐंशी लक्ष फक्त) इतकी रक्कम वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील. त्यांनी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८६(१) व कलम ९७ (१) नुसार सदर रक्कम मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास उपलब्ध करुन द्यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२५०३२८१५१९४२७००९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ADITI ASHOK LEMBHE

Digitally signed by ADITI ASHOK LEMBHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=ceb5712400e1116fd269899721525355fdff0f1c9e88083ec7c5989cd8012199, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=990DB0BB526B1091666DA553E7E0E30BE26640A64E18C3EA2EF4825D35D8EBC1, cn=ADITI ASHOK LEMBHE
Date: 2025.03.28 15:20:43 +05'30'

**(अदिती लेंभे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
३. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, महाराष्ट्र गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
६. मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)
९. अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन) / (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प) गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३. निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.